*सामाजिक वनीकरण विभागातील निर्माण केलेल्या सहाय्यक संचालक पदांना मुदतवाढ देणेबाबत. (१ पद)*

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एफएसटी-१०/१७/प्र.क्र.५९१/फ-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ जानेवारी, २०१९

वाचा :-

१. ग्रा.वि.व.ज.सं.विभाग, शासन निर्णय क्र.आस्था २००६ /प्र.क्र.१५९ (१) /जल-१३, दि.२९.१२.२००७.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र.कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.१/१८-१९/११०१, दि.२५.०९.२०१८
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि -२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०५.०३.२०१८.
४. शासन निर्णय क्र.एफएसटी-१०/१७/प्र.क्र.५९१/फ-४, दि.१५.०३.२०१८.

प्रस्तावना :-

सामाजिक वनीकरण संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयाचा आकृतीबंध संदर्भ क्र.१ अन्वये निश्चित करण्यात आला असून मंजूर आकृतीबंधानुसार सामाजिक वनीकरण संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यरत असलेल्या कार्यालयासाठी सहाय्यक संचालक संवर्गातील १ पदाला दि.०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भ क्र.४ अन्वये शासन मान्यता दिली होती.

२. सामाजिक वनीकरण संचालनालयाच्या दि.२९.१२.२००७ मंजूर आकृतीबंधानुसार सहाय्यक संचालक यांची एकूण ५४ पदे मंजूर होती. त्यापैकी सामाजिक वनीकरण संचालनालय कार्यालयात सहायक संचालकाचे १ पद शासन निर्णय क्र.एमएफएस-२०१५/प्र.क्र.१४८/फ-८, दि.०२.०७.२०१५ अन्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे कार्यालयातील अर्थसंकल्प नियोजन व विकास विभाग यांच्याकडे सामाजिक वनीकरण संबंधातील प्रकरण हाताळण्यासाठी वर्ग करण्यात आली आहे. सदर सहाय्यक संचालक संवर्गातील १ अस्थायी पदाला सन २०१८-१९ मध्ये दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांचे क्र.कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.१/१८-१९/११०१ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार पुढील मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय :-**

सामाजिक वनीकरण संचालनालयाच्या नियंत्रणाखालील सहाय्यक संचालक संवर्गातील १ पदाला दि.०१.१०.२०१८ ते दि.२९.०२.२०१९ पर्यंत पुढे चालु ठेवण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे :-

अ) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विविव्ही-१०९७ /प्र.क्र.२६ /९७ /अर्थसंकल्प-१९, दि.२०.१२.१९९७ नुसार अस्थायी पदांना मुदतवाढ देताना कर्मचारीवृंदाच्या मानकाचे पुनर्विलोकन योजना / कार्यक्रम यांचा आढावा घेण्यात यावा.

ब) अधिसंख्य पदे निवृत्ती अथवा अन्य कोणत्याही कारणामुळे रिक्त झाली असल्यास सदर पदे आपोआपच व्यपगत होतील.

क) जी पदे ठराविक कालावधीसाठी मंजूर करण्यात आली आहेत, अशी पदे ठराविक कालावधी संपल्यानंतर निरसित करण्यात यावीत.

ड) प्रपत्र क्र.१ मधील पदांसाठी वेतनावरील येणारा खर्च प्रपत्रात दर्शविलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर आदेश हे वित्त विभागाच्या क्रमांक पदनि-२०१६ /प्र.क्र.०८ /१६ /आपुक, दि.०७.०९.२०१८ रोजीच्या निर्णयानुसार प्रशासकीय विभागाना दिलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११७१५३६४८३२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Babasaheb S. Shinde

Digitally signed by Babasaheb S. Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1706e7b903eb05a5f1c405f3795499452af658b876e10b223a0cef893b6b6689, cn=Babasaheb S. Shinde
Date: 2019.01.17 15:41:17 +05'30'

(बा.सि.शिंदे)
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत-**

१. सहाय्यक संचालक, अर्थसंकल्प नियोजन व विकास विभाग सामाजिक वनीकरण, नागपूर.
२. सर्व वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण विभाग.
३. सर्व विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण विभाग,
४. महालेखापाल, (लेखा परिक्षा , लेखा व अनुज्ञेयता) ,महाराष्ट्र १ व २
५. सर्व कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
६. निवड नस्ती फ-४, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

## प्रपत्र १

## शासन निर्णय, महसूल व वन विभाग,
## क्रमांक एफएसटी-१०/१७/प्र.क्र.५९१/फ-४
## दिनांक: १७ जानेवारी, २०१९ चे सहपत्र योजनेत्तर कर्मचारी वृंद

| अ.क्र. | पदनाम | पद | ज्या लेखाशीर्षतून खर्च करावयाच्या आहे ते लेखाशीर्ष |
|---|---|---|---|
| १. | सहायक वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) | १ | मागणी क्र.सी-०७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०१ वनीकरण-००१ संचालन व प्रशासन, (०१), संचालन व प्रशासन महासंचालक, सामाजिक वनीकरण व मुख्य वनसंरक्षक, (०१)(०३) महासंचालक,सामाजिक वनीकरण व मुख्य वनसंरक्षक (योजनेत्तर ) (२४०६ ८५०६) |